**महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील निवडश्रेणी मधील अधिकाऱ्यांच्या उप आयुक्त/अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी या पदावरील पदस्थापना**

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
शासन आदेश, क्रमांक:मविसे १०/२००६/प्र.क्र.८७/आस्था-३
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
दिनांक:- १९ एप्रिल, २०१०.

संदर्भ : १) शासन निर्णय क्र.: मविसे १०/२००६/प्र.क्र.८७/आस्था-३, दिनांक २ मार्च,२०१०.
२) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र. मविसे ११/२०००/प्र.क्र.३३०५/१०, दिनांक १ ऑगस्ट,२०००.

**आदेश:-**

वरील संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील उप मुख्य कार्यकारी अधिकारी/गट विकास अधिकारी (उच्चश्रेणी)/ सहाय्यक आयुक्त यांना पी.बी.-३ (रु.१५,६००-३९,१००) वेतन बँड आणि रु.६६००/- ग्रेड वेतन ही निवडश्रेणी वेतनश्रेणी मंजूर करण्यात आली आहे. तसेच संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, तसेच उप आयुक्त या पदांवर निवडश्रेणीमधील सेवाज्येष्ठ अधिकाऱ्यांमधून नियुक्ती देण्यात यावी असे निश्चित केले आहे. त्यानुसार संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील निवडश्रेणी वेतनश्रेणी मंजूर केलेल्या **श्री. एस.बी.भोकरे यांना पी.बी.-३ (रु.१५,६००-३९,१००) वेतन बँड आणि रु.६६००/- ग्रेड वेतन या निवडश्रेणी वेतनश्रेणीतच त्यांच्या नावासमोर दर्शविल्यानुसार तात्पुरत्या स्वरुपात खालीलप्रमाणे पदस्थापना देण्यात येत आहे.**

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | सध्याचे पद | पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.एस.बी.भोकरे | सहाय्यक आयुक्त (तपासणी) विभागीय आयुक्त कार्यालय नाशिक | उप आयुक्त (विकास), विभागीय आयुक्त कार्यालय, अमरावती |

२. वरील पदस्थापना खालील अटींच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

(अ) श्री. एस.बी.भोकरे यांची पदस्थापना अस्थायी व तात्पुरत्या स्वरुपाची असून त्यामुळे त्यांना ज्येष्ठतेसंबंधी कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

(ब) याप्रमाणे केलेली पदस्थापना मा.उच्च न्यायालय खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल करण्यात आलेला रिट याचिका क्रमांक २१७८/२००३, २०५५/२००३ , ३३५९/२००३ व २४६६/२००५ च्या तसेच आरक्षणासंदर्भात उच्च न्यायालयात दाखल झालेल्या याचिका क्रमांक ८४५२/२००४, ३७९/२००५, ४७०/२००५ व ४७२/२००५ वरील सन्माननीय उच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या आधीन राहून करण्यात येत आहे.

(क) श्री. एस.बी.भोकरे यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ हजर व्हावे. त्यांचे लक्ष शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक: एसआरव्ही १०८७/११३१/प्र.क्र.११-८९/१२, दिनांक ३० एप्रिल,१९९१ कडे वेधण्यात येत आहे. नियुक्ती दिलेल्या ठिकाणी हजर न झाल्यास सदर परिपत्रकातील तरतुदीनुसार त्यांच्या पदस्थापना रद्द करण्याबाबत कारवाई करण्यात येईल याचीही त्यांनी नोंद घ्यावी.

(ड) संबंधित विभागीय आयुक्त यांनी वरीलप्रमाणे पदस्थापना करण्यात आलेल्या अधिकाऱ्याला त्यांच्या नवीन नियुक्तीच्या जागी त्वरित रुजू व्हावे म्हणून आवश्यक ती स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन त्वरित पदमुक्त करावे व नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर होण्यास सांगावे.

३. श्री. एस.बी.भोकरे यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होताच पदभार स्विकारल्याचा दिनांक शासनास त्वरित कळवावा.

४. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००४१९१७२३३६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सरिता बांदेकर-देशमुख )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति

१. सर्व विभागीय आयुक्त.
२. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
३. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी.
४. महालेखापाल- १ ( लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. महालेखापाल- २ ( लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६. श्री.एस.बी.भोकरे यांना (विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, नाशिक यांचेमार्फत.
७. मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
८ मा.मंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
९. मा.राज्यमंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
१०. मा.सचिव ( ग्राम विकास व पंचायत राज ) यांचे स्वीय सहायक.
११. सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१२. उपसचिव (आस्थापना/योजना) ग्राम विकास व जलसंधारण विभाग.
१३. कार्यासन क्रमांक : आस्था - २ ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१४. निवड नस्ती ( कार्यासन क्रमांक :आस्था-३ ) ग्राम विकास व जलसंधारण विभाग.

E:\Deshmukh-est-3\C R 87-06.lwp